**पुणे विद्यापीठात "महात्मा फुले अध्यासन" साठी अनुदान मंजुर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
शासन निर्णय क्रमांक : पीयुपी-२००९/(१६१/०९)/विशि-२
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ११ फेब्रुवारी, २०१०.

**वाचा :-** १. संचालक ( उ. शि.) महाराष्ट्र राज्य पुणे यांचे पत्र क्र. युएनआय/२००९-१० योजनांतर्गत योजना /विशि-१, दिनांक ७.१.२०१०

**शासन निर्णय :-** शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. युपीजी-१४९९/(२५१/९९)/विशि-५, दिनांक ८/३/२००० अन्वये पुणे विद्यापीठात महात्मा फुले अध्यासन स्थापन करण्यास शासनाने मंजुरी दिलेली आहे. सदर अध्यासनासाठी सन २००९-२०१० यावित्तीय वर्षात योजनांतर्गत योजना या तरतुदी खाली रु. ५.००/- लक्ष एवढी तरतूद करण्यात आलेली आहे. त्यापैकी रु. १.६७ लक्ष तरतूद लेखानुदानाद्वारे उपलब्ध करुन देण्यात आली आहे. त्यानुसार महात्मा फुले अध्यासनासाठी रु. १.६७/- लक्ष ( अक्षरी रु. एक लक्ष सदुसष्ठ हजार फक्त ) एवढी रक्कम अनुदानापोटी या आदेशान्वये मंजुर करण्यात येत आहे.

२. सदर अनुदानाची रक्कम संचालक ( उच्च शिक्षण ) महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी पुणे विद्यापीठास त्वरीत अदा करावी.

३. वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१ किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल - २ नागपूर त्यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणी करीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी मंजुर केलेल्या अनुदानाचा वापर त्याच उद्दिष्टासाठी करावा आणि त्याबाबतचे विनियोजन प्रमाणपत्र (Utilisation Certificate)संबंधितांना योग्य वेळी सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

४. याबरील खर्च, मागणी क्र. डब्ल्यू-२,२२०२- सर्व साधारण शिक्षण, ०३ विद्यापीठीय व उच्च शिक्षण-१०२, विद्यापीठांना सहाय्य, (००) (१०) पुणे विद्यापीठात महात्मा फुले अध्यासन (२२०२ ३४५९) ३१ सहायक अनुदाने या लेखाशिर्षाखालील सन २००९-१० या वित्तीय वर्षात मंजुर करण्यात आलेल्या तरतुदी मधून भागविण्यात यावा.

५.	हा शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि. १५ मे, २००९ मधील भाग पहिला उप विभाग तीन मधील अ.क्र. ४ नियम क्रमांक २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६.	हा शासन निर्णय शासनाच्या वेबसाईडवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१००२१२१३०७२७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( रा. गो. जाधव )
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हील, मुंबई,
२) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
३) कुलसचिव, पुणे विद्यापीठ, पुणे
४) सहसंचालक ( उच्च शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे
५) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
६) महालेखापाल, (लेखा परीक्षण) -१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
७) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
८) नियोजन विभाग, (का-१४७१) मंत्रालय, मुंबई.
९) वित्त विभाग,(व्यय-५) ( अर्थसंकल्प-३/८) मंत्रालय, मुंबई.
१०) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) मा. प्रधान सचिव,उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१२) उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१३) अवर सचिव (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४) निवड नस्ती (विशि-२)

My Documents\Nilima\G.R\Mahatma Pule Adhasan Pune- PUP १६१.०९.doc